राज्यातील अल्पसंख्याक समाजाचे
शैक्षणिक धोरण तयार करण्यासाठी
अभ्यासगट स्थापन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बैठक-२०२१/(१३४/२१)/ एसएम-६**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ३२
दिनांक : १७ नोव्हेंबर, २०२१

**प्रस्तावना:-**

राज्यातील अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थी व शैक्षणिक संस्थांसाठी मोफत गणवेश,मोफत पाठयपुस्तके, शिष्यवृत्ती तसेच पायाभूत सुविधांसाठी अनुदान अशा विविध योजना शासन राबवित आहे. अल्पसंख्याक समाजासाठी स्वतंत्र शैक्षणिक धोरण तयार करण्यासाठी अधिक अभ्यास करणे शासनास आवश्यक वाटत असल्याने यासाठी आयुक्त (शिक्षण) यांच्या अध्यक्षतेखाली शिक्षण तज्ज्ञांचा समावेश असलेला एक अभ्यासगट बनविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

अल्पसंख्याक समाजासाठी स्वतंत्र शैक्षणिक धोरण तयार करणे या विषयी सखोल अभ्यास करुन शासनास अहवाल सादर करण्यासाठी आयुक्त (शिक्षण) यांच्या अध्यक्षतेखाली खालील अभ्यासगट स्थापन करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव व पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | आयुक्त ( शिक्षण),महाराष्ट्र राज्य, पुणे | अध्यक्ष |
| २ | मा. आ. डॉ. वजाहत मिर्झा, विधान परिषद सदस्य | **सदस्य** |
| ३ | श्री. एम.एम.शेख, औरंगाबाद | **सदस्य** |
| ४ | श्री. किशोर बोरकर, अध्यक्ष, अपंग जीवन विकास संस्था, अमरावती द्वारा संचलित संत गाडगे महाराज विद्यालय व कनिष्ठ महाविद्यालय, नवाथेनगर, अमरावती | **सदस्य** |
| ५ | डॉ. जहीर काझी, अध्यक्ष, अंजुमन इस्लाम एज्युकेशनल ट्रस्ट | **सदस्य** |
| ६ | डॉ. किशोर एस. पेशोरी, प्राचार्य, मिठीबाई मोतीराम कुंदनानी कॉलेज ऑफ कॉमर्स ॲण्ड इकॉनॉमिक्स, बांद्रा (पश्चिम) | **सदस्य** |
| ७ | डॉ. फ्रेजर मास्कारेन्स एस.जे., व्यवस्थापक, सेंट स्टॅनिसलस् हायस्कूल, बांद्रा | **सदस्य** |
| ८ | श्रीमती संगिता बेवली, उप प्राचार्य, गुरुनानक खालसा कॉलेज, मंबई. | **सदस्य** |

| | | |
|---|---|---|
| **९** | श्रीमती झेनीथ एल. डिसोजा, मुंबई | **सदस्य** |
| **१०** | ॲड. श्रीमती रुबीना अख्तर हसन रिझवी, संचालक, रिझवी कॉलेज | **सदस्य** |
| **११** | श्री. पी.ए. इनामदार, अध्यक्ष, आझम कॅम्पस, पुणे | **सदस्य** |
| **१२** | ॲड. मार्कस देशमुख, पुणे | **सदस्य** |
| **१३** | श्री. तुषार एकनाथ गायकवाड, संचालक, अभय शिक्षण केंद्र, मुंबई. | **सदस्य** |
| **१४** | शिक्षण संचालक, (माध्यमिक व उच्च माध्यमिक), म.रा., पुणे | **सदस्य** |
| **१५** | शिक्षण संचालक (प्राथमिक), म.रा.,पुणे | **सदस्य** |
| **१६** | संचालक, अल्पसंख्यांक व प्रौढ शिक्षण संचालनालय, पुणे | **सदस्य सचिव** |

२. सदर अभ्यासगटाची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील:-

१) अल्पसंख्याक समाजाच्या शैक्षणिक विकासासाठी सध्या सुरू असणा-या किंवा सुरू करावयाच्या शासकीय योजनांबाबत विचारविनिमय तसेच सखोल अभ्यास करणे व याअनुषंगाने शासनास शिफारस करणे.

२) बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ व त्याअनुषंगाने अल्पसंख्याक शाळा / संस्थांबाबत मा. सर्वोच्च न्यायालयाने १) T.M.Pai (२००२) ८ SCC ४८१, २) Islamic Academy of Education (२००३) ८ SCC ६९७, ३) P.A. Inamdar (२००५) ६ SCC ५३७, ४) Pramiti Educational Trust (२०१४) ८ SCC १ या चार न्यायालयीन प्रकरणात अल्पसंख्याक शाळांना बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील काही तरतूदी लागू होत नसल्याबाबत आदेश दिलेले आहेत. या अनुषंगाने या व अन्य न्यायालयीन प्रकरणांचा अभ्यास करुन अल्पसंख्याक शाळांकरिता शाळा, विद्यार्थी, शिक्षक या संदर्भात प्रशासकीय व शैक्षणिक धोरण तयार करण्याबाबत शिफारस करणे.

३. आयुक्त ( शिक्षण) यांच्या अध्यक्षतेखालील सदरहू अभ्यासगटाने वरील बाबींचा सखोल अभ्यास करून आपल्या शिफारशी ३ महिन्यात शासनास सादर कराव्यात.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२१११७१७१६१६८७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2021.11.18 17:52:59 +05'30'

**( इ. मु. काझी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
५. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
६. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
७. शिक्षण संचालक (अल्पसंख्याक व प्रौढ शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
८. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
९. शिक्षण संचालक (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
११.सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/प्रौढ) जिल्हा परिषद
१२.सर्व समिती सदस्य
१३.निवड नस्ती (एसएम-६).